लोकसभा सार्वत्रिक निवडणूका-२०२४ च्या अनुषंगाने उप जिल्हाधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांची बदलीने पदस्थापना...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. टिआरएफ-०२२४/प्र.क्र.४५/ई-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०५ मार्च, २०२४

**संदर्भ**:- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२१/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१
३) मा. भारत निवडणूक आयोगाचे क्र. ४३७/६/१/INST/ECI/FUNCT/MCC/२०२३, दि.२१.१२.२०२३, दि.२३.०२.२०२४ व दि.२७.०२.२०२४ रोजीची पत्रे.

**शासन आदेश**:-

मा. भारत निवडणूक आयोगाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील पत्रांन्वये विहित केलेल्या तरतुदी व महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) आणि ४(५) मधील तरतुदींनुसार उप जिल्हाधिकारी संवर्गातील खालील अधिका-यांना प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | कार्यरत पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. ललितकुमार वऱ्हाडे | उप विभागीय अधिकारी, कारंजा, जि. वाशिम | **उप जिल्हाधिकारी (रोहयो), नांदेड** या श्री. नितीन राऊत यांच्या अंशत: बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| २. | श्री. सखाराम मुळे | उप विभागीय अधिकारी, यवतमाळ | **उप विभागीय अधिकारी, उमरखेड, जि. यवतमाळ** या श्री. सुधीर राठोड यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल केल्यामुळे रिक्त होणा-या पदावर |
| ३. | श्री. संजय खडसे | उप विभागीय अधिकारी, दारव्हा, जि.यवतमाळ | **उप विभागीय अधिकारी, सिंदखेडराजा, जि. बुलढाणा** या श्री. सदाशिव शेलार यांचे पदस्थापनेचे आदेश रद्द केल्यामुळे रिक्त होणा-या पदावर |
| ४. | श्री. सदाशिव शेलार | उप विभागीय अधिकारी, सिंदखेडराजा, जि. बुलढाणा (रुजू नाहीत) | दि.१५.०२.२०२४ रोजीचे पदस्थापनेचे आदेश रद्द करुन ते पूर्वीच्या **जिल्हा पुनर्वसन अधिकारी, बुलढाणा** या पदावर कार्यरत राहतील. |

| | | | |
|---|---|---|---|
| ५. | श्री. बाबासाहेब वाघमोडे | उप विभागीय अधिकारी, गडहिंग्लज, जि. कोल्हापूर | **सह जिल्हा निबंधक, मुद्रांक जिल्हाधिकारी, कोल्हापूर** या श्री. मल्लिकार्जुन माने यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ६. | श्री. मल्लिकार्जुन माने, | सह जिल्हा निबंधक, मुद्रांक जिल्हाधिकारी, कोल्हापूर | **उप विभागीय अधिकारी, गडहिंग्लज, जि. कोल्हापूर** या श्री. बाबासाहेब वाघमोडे यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ७. | श्रीमती अरुणा संगेवार | उप विभागीय अधिकारी, हदगाव, जि. नांदेड | **उप विभागीय अधिकारी, कंधार, जि. नांदेड** या श्री. अविनाश कांबळे यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ८. | श्री. अविनाश कांबळे | उप विभागीय अधिकारी, कंधार, जि. नांदेड | **उप विभागीय अधिकारी, हदगाव, जि. नांदेड** या श्रीमती अरुणा संगेवार यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ९. | श्रीमती मंजुषा लटपटे | विशेष भूसंपादन अधिकारी, परभणी | **उप विभागीय अधिकारी, अहमदपूर, जि. लातूर** या श्री. प्रविण फुलारी यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| १०. | श्रीमती मनिषा दांडगे | उप विभागीय अधिकारी, अंबाजोगाई, जि. बीड | दि.२१.०२.२०२४ रोजीच्या आदेशान्वये देण्यात आलेल्या पदस्थापनेत अंशत: बदल करुन **उप विभागीय अधिकारी, परतूर, जि. जालना** या रिक्त पदावर |
| ११. | श्री. दिपक वजाळे | सहायक आयुक्त (भूसुधार), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर | वाटप करण्यात आलेला नागपूर विभाग कायम ठेवून **उप विभागीय अधिकारी, अंबाजोगाई, जि. बीड** या श्रीमती मनिषा दांडगे यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल केल्यामुळे रिक्त होणा-या पदावर |
| १२. | श्री स्वप्नील मोरे | उप जिल्हाधिकारी (सामान्य), हिंगोली | **जिल्हा पुनर्वसन अधिकारी, पुणे** या रिक्त पदावर |
| १३. | श्री. सुमित शिंदे | अन्न धान्य वितरण अधिकारी, सोलापूर | **उप जिल्हाधिकारी (भूसंपादन क्र.१), सोलापूर** या रिक्त पदावर |
| १४. | श्री विवेकानंद काळकर | वन जमाबंदी अधिकारी अमरावती | **उप विभागीय अधिकारी, माजलगाव, जि. बीड** या श्री. कैलास देवरे यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल केल्यामुळे रिक्त होणा-या पदावर |
| १५. | श्री. कैलास देवरे | उप विभागीय अधिकारी, माजलगाव, जि. बीड | **उप विभागीय अधिकारी, कारंजा, जि. वाशिम** या श्री. ललितकुमार व-हाडे यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |

२. उपरोक्त अधिका-यांच्या बदलीमुळे रिक्त झालेल्या पदांवर अन्य अधिका-यांच्या नियुक्तीचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. श्री. नितीन राऊत, श्री. सुधीर राठोड व श्री. प्रविण फुलारी यांच्या नियुक्तीचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, दि०१.१२.२०२३ अन्वये नियुक्तीच्या प्रतिक्षेतील अधिका-यांनी पुढील आदेशापर्यंत संबंधित विभागीय आयुक्तांकडे रुजू व्हावे.

३. सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून उपरोक्त नमूद अधिका-यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरून या आदेशान्वये एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. संबधित अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत e२.revenue@maharashtra.gov.in या ई-मेलद्वारे/ टपालाद्वारे शासनास त्वरित कळवावे.

४. मा. भारत निवडणूक आयोगाने संदर्भाधीन क्र.३ येथील पत्रांन्वये दिलेले निर्देश विचारात घेता निवडणूक कामकाजासाठी अधिसूचित पदे भरणे आवश्यक असल्यामुळे प्रतिनियुक्तीच्या पदावर कार्यरत असलेल्या अधिका-यांच्या प्रतिनियुक्तीच्या सेवा संपुष्टात आणून आवश्यकतेनुसार त्यांना संवर्गातील पदावर पदस्थापना दिली आहे. तसेच निवडणूक कामकाजासाठी अधिसूचित पदे भरणे आवश्यक असल्यामुळे प्रशासकीय कारणास्तव बदलीपात्र नसलेल्या अधिका-यांना सदर पदांवर पदस्थापना दिली आहे.

५. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतूदींनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५० व महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील तरतूदींनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन" (dies non) म्हणून गणला जाईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

८. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३०५१८४२०८६९१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH VITHOBA GAWDE

Digitally signed by SANTOSH VITHOBA GAWDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=8e111cd4ca87dbe700ee92d0e1b3fd993c8b0952a368e400ed2af72cb5dd990c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CA6A91A5EFCF2DDE6274B385D86F23914275B4E2B1125F6E74E6A1FAC7106C22, cn=SANTOSH VITHOBA GAWDE
Date: 2024.03.05 19:05:13 +05'30'

**(संतोष वि. गावडे)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२) सर्व विभागीय आयुक्त.

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित जिल्हाधिकारी.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- संबंधित उप जिल्हाधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त यांचेमार्फत).
- उप सचिव (ई-२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-२).